अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील अपर
संचालक या पदावर पदोन्नती व पदस्थापना

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्र.पदोनि -१११४ / प्र.क्र.३२ / का.१४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २०/०३/२०१७

**शासन आदेश**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील खालील नमूद अधिकाऱ्यांना अपर संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय या संवर्गातील (वेतनसंरचना, वेतन बँड रुपये १५६००-३९१००+ग्रेड वेतन रु.७६००) पदावर खालील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधिन राहून, या आदेशाच्या दिनांकापासून तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. सदरहु पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | सध्याचे पद | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आलेले पद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.विजय कृष्णा आहेर | उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, औरंगाबाद | अपर संचालक (मूल्यमापन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई (रिक्त पद) |

२. सदर पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर आदेशानुसार पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे व त्याची एक प्रत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची नसल्यास तसे लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

२) सदर पदोन्नती तदर्थ व मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री.विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहील.

३) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

४) सदर पदोन्नती वयाच्या ५५ व्या वर्षापलिकडे सेवेत ठेवण्याबाबत पुनर्विलोकनाच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

५) पदोन्नतीच्या पदावर रुजु झाल्यानंतर सदर अधिकाऱ्यांनी ७ दिवसाच्या आत त्यांचे ई-प्रोफाईल सुधारित करुन त्याची प्रत शासनास तसेच अर्थ व सांख्यिकी संचालनालयास सादर करावी. प्रत सादर न केल्यास त्यांचे चालू महिन्याचे वेतन अदा केले जाणार नाही.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्र. २०१७०३२०११४०४४७९१६ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Pradnya S Mahale

Digitally signed by Pradnya S Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e, cn=Pradnya S Mahale
Date: 2017.03.20 16:47:45 +05'30'

**( प्रज्ञा महाले )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर,
२) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ व २ मुंबई /नागपूर,
३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
५) मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
६) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने)
७) सर्व विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय,
८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
९) सामान्य प्रशासन विभाग (का.१२/१३/१६-ब), मंत्रालय, मुंबई,
१०) सर्व सह सचिव/उप सचिव/विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) सर्व सह संचालक /उप संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय
१२) उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५) श्री.विजय कृष्णा आहेर, उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद
१६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२,
१७) निवड नस्ती